**नांदेड शहरातील मदिना नगर येथील मदिना तुल उलूम शाळे जवळील सर्वे नं.१२६९२ येथील महानगरपालिकेच्या मालकीच्या भूखंडावर उर्दू घर बांधण्यासाठी वर्ष २०१५-१६ मध्ये निधी उपलब्ध करुन देणेबाबत.**

महाराष्ट्र शासन

अल्पसंख्याक विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः नाउंघ २०१३/प्र.क्र.१२६/का.४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

तारीख: १० सप्टेंबर, २०१५

<u>वाचा</u>

१. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांकः नाउंघ २०१३/प्र.क्र.१२६/का.४ दि.४ फेब्रुवारी, २०१४.
२. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अर्थ २०१५/प्र.क्र.८५/का.४,दि.१७ एप्रिल, २०१५
३. शासन परिपत्र, अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांकः अर्थ २०१५/प्र.क्र.बियुडी-२०१४/ प्र.क्र.१४८/ (भाग-२)/का.७, दि.२१.४.२०१५.
४. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांकः नाउंघ २०१३/प्र.क्र.१२६/का.४ दि.२८ मे, २०१५.

<u>प्रस्तावना</u>

मदिना नगर, नांदेड येथील मदिना तुल उलूम शाळे जवळील सर्वे नं.१२६९२ येथील महानगर पालिकेच्या मालकीच्या भूखंडावर उर्दू घर बांधण्याच्या रु.८,१६,००,०००/- ( रुपये आठ कोटी सोळा लक्ष फक्त) इतक्या किंमतीच्या प्रस्तावास मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखालील उच्च स्तरीय सचिव समितीच्या दि.३ जानेवारी, २०१४ रोजी पार पडलेल्या बैठकीत मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. त्यास अनुसरुन, मदिना नगर, नांदेड येथील मदिना तुल उलूम शाळे

जवळील सर्वे नं.१२६९२ येथील महानगर पालिकेच्या मालकीच्या भूखंडावर उर्दू घर बांधकामासाठी सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती

## शासन निर्णय

नांदेड शहरातील मदिना नगर येथील मदिना तुल उलूम शाळे जवळील सर्वे नं.१२६९२ येथील महानगर पालिकेच्या मालकीच्या भूखंडावर उर्दू घर बांधण्याच्या रु.८,१६,००,०००/- (रुपये आठ कोटी सोळा लक्ष फक्त) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सन २०१५-०६ या आर्थिक वर्षाच्या कालावधीतील पहिल्या आठ महिन्यांसाठी अर्थसंकल्पीय अंदाजपत्रकामध्ये उर्दू घर बांधण्यासाठी रु.७०.०० लाखाची तरतूद करण्यात आली आहे. त्यापैकी संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये नांदेड उर्दू घरासाठी रु.३०,००,०००/-(रुपये तीस लाख मात्र) इतके अनुदान वितरित करण्यात आली आहे. आता प्रस्तुत प्रयोजनासाठी रु.१९,००,०००/- (रुपये एकोणीस लाख मात्र) इतके अतिरिक्त अनुदान वितरित करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अतिरिक्त जिल्हाधिकारी, नांदेड यांन सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या रु.१९,००,०००/-(रुपये एकोणीस लाख मात्र) इतकी रक्कम अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरण व संवितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे. त्यांनी सदर निधी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड यांना तात्काळ वितरित करावा व निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

यावर होणारा खर्च “मागणी क्रमांक झेडई-१ २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण - २००-इतर कार्यक्रम-राज्य योजनांतर्गत योजना- (००)-(००)(१८) - उर्दू घरासाठी सहाय्यक अनुदाने (२२३५ ए ५५२) ३१, सहायक अनुदान (वेतनेतर)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं -२०१५/प्रक्र.८५/का.३, दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९१११७०७३०२८१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ainul C Attar

Digitally signed by Ainul C Attar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ainul C Attar
Date: 2015.09.16 13:15:46 +05'30'

( अैनुल अत्तार )

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य,मुंबई/ नागपूर,

२. आयुक्त, औरंगाबाद महसूल विभाग, औरंगाबाद,

३. जिल्हाधिकारी, नांदेड,

४. अतिरिक्त जिल्हाधिकारी, नांदेड

५. आयुक्त, नांदेड वाघाळा महानगरपालिका, नांदेड,

६. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई,

७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड,

८. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड,

९. अधीक्षक-नि-कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दु साहित्य अकादमी, मुंबई,

१०. खाजगी सचिव, मा.मंत्री/मा.राज्यमंत्री (अ.वि.वि.) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई,

११. स्वीय सहायक, प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

१२. स्वीय सहायक, सह सचिव (अ.वि.वि.),अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

१३. कक्ष अधिकारी (का-७). अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

१४. वित्त विभाग / नियोजन विभाग / सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,

१५. निवड नस्ती (का-४)/कार्यासन-४, संग्रहार्थ.